मंत्रालयाबाहेरील कार्यालयात उच्चश्रेणी
लघुलेखकाच्या पदोन्नतीच्या स्तराचे
स्वीय सहाय्यक पद निर्माण करणेबाबत.

महाराष्ट्र शासन,
सामान्य प्रशासन विभाग,
शासन परिपत्रक, क्रमांक-एसआरव्ही-१०९१/प्र. क्र.-१५/८९/२१९३/१२,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
दिनांक : ५ डिसेंबर, १९९१.

वाचा : शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक-एसआरव्ही-१०८९/सीआर-१५/८९/बारा, दिनांक १६. १०. ९०

शासन परिपत्रक

शासन सेवेतील मंत्रालयाव्यतिरिक्त अन्य कार्यालयामधील उच्चश्रेणी लघुलेखकांच्या बाबतीत त्यांना वरच्या पदावर पदोन्नतीच्या संधी उपलब्ध नव्हत्या. त्यामुळे उच्चश्रेणी लघुलेखकांना त्याच पदावर अनेक वर्षे काम करावे लागत असे. ही कुंठीतता दुर करण्याच्या दृष्टीकोनातून उच्चश्रेणी लघुलेखकांना वरच्या पदावर पदोन्नती देण्याच्या दृष्टीने प्रश्न तपासण्यात आला. त्यानुसार शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक-एसआरव्ही-१०८९/प्र. क्र. १५/८९/बारा, दिनांक १६ ऑक्टो. १९९० अन्वये असे आदेश दिले आहेत की, मंत्रालयाबाहेरील शासकीय कार्यालयात किंवा विभागात एका नियुक्ती प्राधिकाऱ्याच्या कक्षेत उच्चश्रेणी लघुलेखकांची चार किंवा त्यापेक्षा अधिक पदे असतील तर अशा प्रत्येक चार पदांपैकी एक पदोन्नतीचे पद [२५ टक्के या प्रमाणात तथापि अपुर्णांक दुर्लक्षित करण्यात यावेत.] रुपये २३७५-७५-३२००-द. रो.-१००-३५०० या वेतनश्रेणीमध्ये स्वीय सहाय्यकाचे पद निर्माण करण्याचा निर्णय घेण्यात आला आहे.

२. यासंबंधात, शासनाच्या असे निदर्शनास आले आहे की, वरीलप्रमाणे स्वीय सहाय्यकाचे पद निर्माण केल्यानंतर त्यावर पदोन्नती देताना सामान्य प्रशासन विभागाच्या क्रमांक-एसआरव्ही-१०७७/सीआर-३४३/७९/१२, दिनांक १८ मे, ८३ च्या निर्णयात नमुद केलेल्या तत्वानुसार, ज्यांच्याबाबतीत गोपनीय अभिलेख अत्युत्कृष्ट आहेत, त्यांना पदोन्नती देताना ६ स्थानांपर्यन्त वरचढपणा देण्यात यावा, या तत्त्वाचे अनुपालन केले जात आहे. परिणामी, जेष्ठतेनुसार ज्यांना स्वीय सहाय्यकाच्या पदाचा लाभ मिळु शकला असता, अशा जेष्ठ व्यक्तींच्या मनामध्ये नैराश्याची भावना निर्माण होऊन, शासन निर्णय, दि. १६. १०. ९० या मुळ उद्देशच पराभुत होण्याची संभावना निर्माण झाली आहे. अतएव, शासनाचे यासंदर्भात असे आदेश आहेत की, वर नमुद केल्याप्रमाणे स्वीय सहाय्यकाच्या पदावर उच्चश्रेणी लघुलेखकांना पदोन्नती

[कृ. मा. प.]

देताना ६ स्थानांपर्यन्तचे वरचढपणा देण्याबाबतचे आदेश विचारात घेण्यात येऊ नयेत. अशा पदोन्नत्या केवळ जेष्ठता अधीन पात्रता या तत्त्वानुसार करण्यात याव्यात. म्हणजेच थोडक्यात, ज्यांचेबाबतीत अत्युत्कृष्ट गोपनीय अभिलेख आहेत, त्यांना सर्वसाधारणत: पात्र ठरणाऱ्या उच्चश्रेणी लघुलेखकाचे वर वरचढपणा देण्यात येऊ नये.

३. यापूर्वी ६ स्थानांपर्यन्त वरचढपणा देण्याच्या आदेशांचा अवलंब करून स्वीय सहाय्यकांच्या पदांवर ज्या पदोन्नत्या करण्यात आल्या असतील, त्यांचे पुनर्विलोकन करण्यात यावे आणि जेष्ठता अधीन पात्रता या तत्त्वानुसारच संबंधित पदोन्नत्या नियमित करण्यात याव्यात. वरचढपणा देऊन ज्यांना पदोन्नत्या दिल्या असतील, त्यांना पदावनत करण्याचा प्रसंग आल्यास त्याप्रमाणे तावडतोब कार्यवाही केली जावी, परंतु त्यास पूर्वलक्षी प्रभाव असू नये.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

[ भा. म. भणगे ]
उपसचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,

राज्यपालांचे सचिव,
मुख्यमंत्र्यांचे सचिव,
प्रबंधक, मुळ न्याय शाखा, उच्च न्यायालय, मुंबई [पत्राने],
प्रबंधक, अपील शाखा, उच्च न्यायालय, मुंबई [पत्राने],
प्रबंधक, लोकआयुक्त व उपलोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई [पत्राने],
शासनाचे सर्व सचिव,
महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई,
महालेखापाल, महाराष्ट्र-२, नागपूर,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
निवासी लेखा अधिकारी, मुंबई,
सर्व विभागीय आयुक्त,
वेगवेगळ्या मंत्रालयीन विभागांच्या अखत्यारीतील सर्व विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख,
सर्व मंत्रालयीन विभाग.